क्षेत्रीय कार्यालयाचे बळकटीकरण अंतर्गत कार्यालयीन खर्च भागविण्याकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता पुरवणी मागणीअंतर्गत लेखाशिर्ष क्र. २२२५ १३९३ खाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरक -२०१६/प्र.क्र. २९५ /कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख:- २९ मार्च, २०१७.

वाचा -

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) वि. वि, शासन परिपत्रक क्र.पूरक २०१६/प्र.क्र. २०१ /अर्थ-३, दि.०४.०१.२०१७.
४) वि. वि, शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र. ८९ /अर्थ-३, दि.०८.०२.२०१७.

**शासन निर्णय-**

लेखाशिर्ष क्र. मागणी क्र. टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०२-अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१ (०१) आदिवासी विकास आयुक्तालय (२२२५ १३९३) या लेखाशिर्षाखाली डिसेंबर, २०१६ च्या अधिवेशनात क्षेत्रीय कार्यालयाचे बळकटीकरण अंतर्गत कार्यालयीन खर्च भागविण्यासाठी रु. ७९३.०० लाख इतक्या निधीची पुरक मागणी मंजूर करण्यात आलेली आहे.

आदिवासी विकास विभागाने निधी वितरणाबाबत सादर केलेल्या प्रस्तावास दिलेल्या मंजूरीच्या त्यानुषंगाने लेखाशिर्ष टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१ (०१) आदिवासी विकास आयुक्तालय (२२२५ १३९३), १३- कार्यालयीन खर्च याखाली मंजूर निधीच्या ८० % प्रमाणात **रु. ६३४.४१ लाख ( अक्षरी रुपये सहा कोटी चौतीस लाख एकेचाळीस हजार फक्त)** इतका निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. **उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.**

३. सदर वितरीत निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) खर्चासाठी नियंत्रक अधिकारी, आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांना सुपूर्द करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी वितरित निधीच्या मर्यादेत व वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१५/ प्र. क्र. ८५ /अर्थ-३,

दिनांक १७-०४-२०१५ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१५/ प्र.क्र. ३४ / कोषा. प्रशा. ५, दि. २४-०७-२०१५ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर आदेश वित्त विभागाच्या वाचा क्र. ४ नुसार विभागास प्राप्त अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७२/ व्यय-१४, दि. २१/०३/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्याwww.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३००९४८०६८८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.30 11:31:45 +05'30'

**भगवान सावंत**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास , ठाणे/ नाशिक/अमरावती/नागपूर.
३. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळमनुरी / पुसद.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.